GR-20040806121911001-1201

अनुदान निर्धारणानुसार जिल्हा परिषदांकडील शिल्लक अनुदानाच्या रकमांची अस्थायी अर्थोपाय अग्रिमातून वसुली.

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास विभाग,
परिपत्रक क्रमांक: अनुदान १०८८/प्र.२८६/३३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २७ ऑगस्ट, १९८८.

**परिपत्रक**

सन १९७४-७५ पूर्वी शासकीय विभागाकडून महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती अधिनियम १९६१ मधील कलम १०० खाली जिल्हा परिषदांना हस्तांतरीत योजना/कामे याच्या करिता अस्थायी अर्थोपाय अग्रिम व मंजूर अनुदानाचे निर्धारणही ग्राम विकास विभागामार्फत करण्यात येत होते. त्या कालावधीत अनुदान निर्धारणानुसार जिल्हा परिषदेकडून येणे रकमांचे समायोजन करण्यात येत होते व जिल्हा परिषदांना देय रकमा आदा अस्थायी अर्थोपाय अग्रिमाद्वारे रोख अदा केल्या जात होत्या. सन १९७४-७५ पासून अनुदान निर्धारणाचे काम त्या त्या अनुदानाने मंजूर करणाऱ्या प्राधिकरणाकडे सोपविण्यात आले. बऱ्याच विभागाचे सदर निर्धारणाचे काम बराच काल प्रलंबित होते व अद्यापही आहे. संबंधित प्राधिकरणानी सदर काम हाती घेतलेले आहे. काही वेळा अनुदान निर्धारणानुसार जिल्हा परिषदांकडे अखर्चित असलेल्या अनुदान शिल्लक आढळून येते. सदर शिल्लक अनुदानाच्या रकमा ग्राम विकास विभागाकडून जिल्हा परिषदांना देण्यात येणाऱ्या अस्थायी अर्थोपाय अग्रिमातून वसूल करण्यात याव्यात अशी सरसकट विनंती शासनाच्या विभागाकडून व काही वेळा जिल्हा परिषदेकडूनसुद्धा सतत करण्यात येत आहे. वास्तविक शिल्लक अनुदानाच्या रकमा दर्शविलेल्या जिल्हा परिषदांनी स्वतः कोषागारात जमा करण्याची जबाबदारी जिल्हा परिषदांची आहे. तसेच त्या रकमा जिल्हा परिषदेकडून वसूल करण्याची जबाबदारी त्या त्या प्राधिकरणाची आहे. त्यासाठी सर्व उपाय प्राधिकरणांनी अगोदर योजावयाचे आहेत. तसे न करता जिल्हा परिषदेकडून वसूल करावयाच्या उक्त रकमा त्यांना देय अस्थायी अर्थोपाय अग्रिमातून परस्पर वजा करा म्हणून विनंती करणे योग्य नाही. कारण अस्थायी अर्थोपाय अग्रिमातून वसुली हा अखेरचा पर्याय आहे.

२. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १००[१][ब] खाली ज्या शासकीय योजना/कामे जिल्हा परिषदांकडे हस्तांतर करण्यात आलेली आहेत, त्यांच्या अंमलबजावणीत अडचणी येऊ नये म्हणून जिल्हा परिषदांना अस्थायी अर्थोपाय म्हणून आगाऊ स्वरुपात निधि उपलब्ध करण्यात येतो. अस्थायी अर्थोपाय हे अनुदान नाही. जिल्हा परिषदांनी केलेल्या प्रत्यक्ष खर्चाच्या आधारे शासनाच्या संबंधित प्राधिकरणांनी त्यांना मंजूर केलेल्या रोख देय नसलेल्या अनुदानाशी अस्थायी अर्थोपाय अग्रिमाचे समायोजन करण्यात येते. वर नमूद केलेल्या वस्तुस्थितीवरून स्पष्ट होते की, अस्थायी अर्थोपाय अग्रिमाचे हस्तांतरीत योजनेसाठी जिल्हा परिषदांना

निधीची कमतरता भासू नये म्हणून उपलब्ध करण्यात आलेला निधिचा हेतू आहे. तसेच त्यामधून जिल्हा परिषदेकडून वसूल करावयाच्या रकमा वसूल केल्याने तेवढा निधि जिल्हा परिषदांना कमी उपलब्ध होऊन योजनांच्या अंमलबजावणीच्या कार्यक्रमावर विपरीत परिणाम होण्याची शक्यता नाकारता येत नाही. तसेच अशाप्रकारे अर्थोपाय अग्रिमातून जिल्हा परिषदेकडून संबंधित विभागाच्या रकमा वसूल करण्यास ग्राम विकास विभागाने संमती दिली नाही. परंतु असतानाही, जिल्हा परिषदेकडील थकित देय रकमा वसूल करण्यात विविध विभागाच्या अडचणी लक्षात घेऊन सर्व बाबी म्हणून वरील प्रकारच्या रकमा जिल्हा परिषदेकडून त्यांना देय अर्थोपाय अग्रिमातून वसूल करण्याची कार्यवाही या विभागाने केली होती.

३. जिल्हा परिषदेकडून शासनाची येणे रक्कम वसूल व्हावी पाहिजे व ती दीर्घ काल प्रलंबित राहू नये याच्याशी ग्राम विकास विभाग सहमत आहे. परंतु तथापि शासकीय विभाग अर्थोपाय अग्रिमाकडे त्यांच्या येणे रकमा वसुलीचे सर्वमान्य सहज साधन म्हणून पहातात हे योग्य नाही. कारण जिल्हा परिषद जेव्हा वसूल करण्याची रक्कम मान्य करते, तेव्हा तेवढी रक्कम जिल्हा परिषदेच्या जिल्हा निधीत शिल्लक असते हे सिध्द होते. सबब उक्त वसुलीची रक्कम रोखीने भरणा करण्यास जिल्हा परिषदांना कसे भाग पाडता येईल ह्या दृष्टीने शासकीय विभागांनी प्रयत्न करावे हे समोचित आहे. जिल्हा परिषदेकडून संबंधित शिल्लक रक्कम अर्थोपाय अग्रिमामधून वसूल करण्यासंबंधी खाली नमूद केल्याप्रमाणे कार्यपध्दती विहित करण्यात येत आहे.

[अ] अनुदान निर्धारित केल्यानंतर जिल्हा परिषदांनी वसुलीची रक्कम रोखीने योग्य त्या शीर्षात कोषागारात भरणा करावी याबाबत प्राधिकरणांनी सूचना द्याव्यात. वरीष्ठ पातळीवरुन याबाबत पाठपुरावा करावा. एकाद्या लेखा शीर्षाखाली जर जिल्हा परिषदेला काही रकमा देय असल्यास, सदर देय रकमेतूनही वसूल करावयाच्या रकमा वसूल कराव्यात.

[ब] शासकीय विभागाने सर्व प्रयत्न करुनही जर जिल्हा परिषदेने वसुलीच्या रकमा रोखीने भरणा करण्याबाबत टाळ टाळ केल्यास, त्या जिल्हा परिषदेस शासकीय विभागाने "बुध्दीपुरस्पर थकबाकीदार" म्हणून घोषित करुन जबरीने वसुली करण्यासाठी ग्राम विकास विभागाकडे [कार्यासन क्रमांक: २५ व २७ कडे] विस्तृत स्वयंस्पष्ट प्रस्ताव सादर करावा.

[क] ग्राम विकास विभाग [कार्यासन क्रमांक: २५ व २७] कडे वरील प्रमाणे प्रस्ताव प्राप्त झाल्यावर, संबंधित विभागीय आयुक्तांनी, वसुलीची रक्कम १५ दिवसांत रोखीने भरणा करण्याचे जिल्हा परिषदेस आदेश द्यावेत व तीन आठवड्यांत वसुलीचा अहवाल ग्राम विकास विभागाच्या कार्यासन २५ व २७ ला सादर करावा. या नंतरही जर संबंधित

